महाराष्ट्र शिक्षण सेवा ( प्रशासन शाखा) गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यामध्ये अंशत: बदल करण्याबाबत.

शिक्षणाधिकारी व तत्सम

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३११९/प्र.क्र.३५/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ मार्च, २०२०

वाचा:- शा.शि.व क्री.वि. शासन आदेश क्र. बदली ३११९/प्र.क्र.३५/प्रशा-२, दिनांक २८.०५.२०१९.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार दिनांक ३१ मे, २०१९ रोजी तीन वर्षाचा कालावधी पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या बदलीचे आदेश दिनांक २८.०५.२०१९ रोजी निर्गमित करण्यात आले आहेत. त्यामध्ये काही अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्याचा निर्णय शासन स्तरावर घेण्यात आला आहे. सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांच्या बदलीच्या पदस्थापनेमध्ये त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक- ४ मध्ये दर्शविलेल्या सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव व पदनाम | दि. २८.०५.२०१९ अन्वये करण्यात आलेली पदस्थापना | सुधारीत पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्रीमती आशा बालाजी गरुड, शिक्षणाधिकारी (प्राथ). जि.प. परभणी | शिक्षणाधिकारी ( प्राथ.) जि.प. यवतमाळ | शिक्षणाधिकारी ( माध्य.) जि.प. जालना | विनंती नुसार |

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

३. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०४१८०५५८४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHIL KHODWEKAR

Digitally signed by SUSHIL KHODWEKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=1c4a8f0aafeac0a009d462f7f02d23942001d76225b9f704de26731171c8684b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=19b0ccbee5810aa5e36e9fa467a7630471d3c500ceb353fbb37bf0b6dfe0407a, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUSHIL KHODWEKAR
Date: 2020.03.04 18:08:01 +05'30'

**( सुशील खोडवेकर भा.प्र.से.)**
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२ सर्व शिक्षण संचालक
३. संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक.
४. संबंधित प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था.
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. निवडनस्ती,प्रशा-२